सन २००१-२००२ या सालाकरीता
"इलेक्ट्रॉनिक टाईपरायटर" ही बाब
दरकरार पाधीतून वगळण्याबाबत.

GR-20021073111565600 1100

महाराष्ट्र शासन
उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग
पूरक शासन निर्णय क्र.भांखस /२००१ /(२१७०) /उद्योग-६
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १४ मार्च,२००१.

वाचा :- १) शासन निर्णय उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्र.भांखस /१०८८ /(२५१२) /उद्योग-६, दि.२.१.१९९२

२) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र.भांखस /दरकरार /इले-टाईपरायटर /(२) /२००१-२००२ /ओ-११७७५, दि.२६/११/२००१.

प्रस्तावना :- दि.२/१/९२ च्या परिशिष्ट "चार" मध्ये "इलेक्ट्रॉनिक टाईपरायटर" ही बाब अनु.क्र.२७ वर आरक्षित आहे. भांडार खरेदी समितीच्या बैठकीत झालेल्या निर्णया संदर्भात विचार विनिमय करुन शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :- शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग क्र.भांखस-१०८८ /(२५१२) /उद्योग-६, दि.२/१/९२ च्या परिशिष्ट चार मध्ये मध्यवर्ती भांडार खरेदी संघटनेच्या दरकरारावर अनु.क्र.२७वर असलेली "इलेक्ट्रॉनिक टाईपरायटर" ही बाब वगळण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

वि.क.साळे
कार्यासन अधिकारी.